**मजूर सहकारी संस्थांनी कामाबद्दल द्यावयाच्या मजुरी व या संस्थांना पात्रता प्रमाणपत्र देताना तपासवयाच्या बाबींबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायप्र-१५१६/प्र.क्र.२४५/९-स**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
दिनांक:- २१.१.२०१७

<u>संदर्भ</u> :- (१) सार्वजनिक बांधकाम व गृहनिर्माण विभाग शासन निर्णय क्रमांक:- LCS१०७७/५५९३३ - desk-२७, दि.३० मार्च, १९७९
(२) कृषी व सहकार विभाग शासन निर्णय क्रमांक:- एल.सी.एस.१०८६/६२९१/७/३६८/९-सी, दि. २३ मार्च, १९८७
(३) कृषी व सहकार विभाग शासन निर्णय क्रमांक:- एल.सी.एस.१०८६/६२९१/७/३६८/९-सी, दि. ३ सप्टेंबर, १९८७
(४) कृषी व सहकार विभाग शासन निर्णय क्रमांक:- एल.सी.एस.१०८८/४०४४/ सी.आर.१७१/ ९-सी, दि. २३ सप्टेंबर, १९८८

<u>प्रस्तावना:-</u>

१. साईबाबा मजूर सहकारी संस्था मर्यादित, चंद्रपूर यांनी शासनास मजूर सहकारी संस्थांमधील, मजूर सदस्यांच्या हिताच्या दृष्टीने काही बाबीवर सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याची विनंती दि.२९.०३.२०१६ व दि. १२.०४.२०१६ रोजीच्या पत्रान्वये केली होती. या पत्रावर कार्यवाही न झाल्यामुळे सदर संस्थेने मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या, नागपूर खंडपीठात याचिका क्रमांक ४९८५/२०१६ दाखल केली होती. या याचिकेप्रकरणी मा. उच्च न्यायालयाने दि. ३१.०८.२०१६ रोजीच्या आदेशानुसार संस्थेच्या सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याच्या मागणीवर दोन महिन्यात निर्णय घेण्याचे आदेश देऊन याचिका खारीज केली आहे. मा. उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार मार्गदर्शक सुचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय:-</u>

२. मा. उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार याचिकाकर्ते यांच्या अर्जातील मुद्यांचा विचार करून मजुरांची खात्री करण्याकरीता खालील अतिरिक्त सुचना देण्यात येत आहेत.

(१) प्रत्येक मजूर सहकारी संस्थेचा सभासद हा फक्त मजूरच असला पाहीजे.

(२) प्रत्येक मजुर सहकारी संस्थेने मजुरांची नोंदवही ठेवावी. नोंदवहीमध्ये मजुरांची नावे, त्यांचे आधारकार्ड क्रमांक/ मतदान ओळखपत्र क्रमांक, बॅकेचे नाव व खाते क्रमांक या माहितीचा समावेश असावा.

(३) मजुर सहकारी संस्थेने सभासदांची कामाबद्दलची मजुरी त्यांच्या बॅंक खात्यात धनादेश/Electronic Clearance (E.C.) द्वारे जमा करावी.

(४) संस्थेस सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णयानुसार वर्गीकरणासाठी पात्रता प्रमाणपत्र देण्याकरिता यापुढे संस्थेच्या अध्यक्षांनी अर्ज करताना त्यांनी मागील वर्गीकरणाचे पात्रता प्रमाणपत्र मिळाल्यापासून अर्ज करण्याच्या दिनांकापर्यन्त केलेल्या कामाची संख्या, मिळालेली मजूरीची रक्कम व प्रत्येक मजूर सभासदांच्या बॅंक खात्यात किती रक्कम जमा केली याबाबतचा तपशिल सादर करणे

आवश्यक राहील. तसेच सादर केलेली माहिती खरी असल्याबाबत "प्रपत्र-अ" नुसार स्वयंघोषणापत्र सादर करावे. या स्वयंघोषणाच्या आधारे संबंधीत सहाय्यक निबंधक/ उपनिबंधक यांनी पात्रता प्रमाणपत्र द्यावे.

(५) संस्थेने सादर केलेले स्वयंघोषणापत्र भविष्यात खोटे असल्याचे आढळल्यास, त्या संस्थेस शासकीय कामाचे वाटप करण्यात येणार नाही.

(६) उपरोक्त तरतुदीचे पालन होत आहे की नाही याबाबतची खात्री करण्याची जबाबदारी सर्व जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था यांची राहील. तसेच याबाबत विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था आणि सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी वेळोवेळी आढाव्याद्वारे नियंत्रण ठेवावे.

३. सदरचा शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासुन लागु राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०१२३१०४९४५५९०२ असा आहे. शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mahendra S Pujari

Digitally signed by Mahendra S Pujari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8b5a303a1aac7ca1cc574b4617cc25b1634df3f64ec897959300a5d5688c1454, cn=Mahendra S Pujari
Date: 2017.01.23 11:54:48 +05'30'

**(महेंद्र पुजारी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

(१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
(२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
(३) मा. मंत्री (सहकार) व मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
(४) सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
(५) मा. विरोधी पक्ष नेता दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ मुंबई.
(६) सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य व संसद सदस्य.
(७) मा.मुख्य सचिव महाराष्ट्र राज्य.
(८) सर्व मा. अप्पर मुख्य सचिव, मा.प्रधान सचिव व मा.सचिव,सर्व मंत्रालयीन विभाग,मंत्रालय, मुंबई.
(९) सर्व विभागीय आयुक्त.
(१०) सर्व उप सचिव (सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग)
(११) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
(१२) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
(१३) सर्व जिल्हा उप निबंधक /सहायक निबंधक,सहकारी संस्था
(१४) सहकार पणन वस्त्रोद्योग विभागातील सर्व कार्यासने
(१५) निवड नस्ती ९-स

| |
|---|
| मजुर<br>सहकारी<br>संस्थेच्या<br>अध्यक्षाचा<br>फोटो |

**प्रपत्र-अ**

स्वयंघोषणापत्र

(साध्या कागदावर)

मी श्री./श्रीमती/कु.------------------------------ अध्यक्ष---------------------मजूर सहकारी संस्था, तालुका------------, जिल्हा---------,वय---------वर्ष, आधार क्रमांक----------------- याद्वारे घोषित करतो की, माझ्या संस्थेच्या मजुर नोंदवहीमध्ये नोंद केलेले सर्व सभासद मजुर आहेत व ते सर्व जिवित आहेत. या नोंदवहीत नमुद केलेले सभासदांचे मतदान ओळखपत्र क्रमांक/आधार कार्ड क्रमांक, बँकेचे नाव व खाते क्रमांक ही माहिती बरोबर आहे. प्रत्येक मजुर सभासदांच्या, बँक खात्यात त्यांची कामाबद्दलची मजुरी, धनादेश/Electronic Clearance (E.C.) द्वारे जमा केली आहे. स्वयंघोषणापत्रामध्ये दिलेली माहिती भविष्यामध्ये खोटी आढळल्यास महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० व नियम १९६१ खालील व अन्य लागु असलेल्या कोणत्याही कायदयानुसार मी शिक्षेस पात्र राहीन याची मला पूर्ण जाणीव आहे.

ठिकाण----------

मजुर संस्थेच्या अध्यक्षाचे नाव व सही----------------

दिनांक-----------

